**मा.औद्योगिक न्यायालय, अकोला यांनी दि.४/१२/२०१९ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयानुसार जिल्हा फळरोपवाटिका, बुलढाणा येथील सौ.लता अनिल डुकरे (पाटील), रोजंदारी मजूर यांना कामावर घेवून त्यांना निलंबन कालावधीचे वेतन अदा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०२०/प्र.क्र.५०/१३-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २० ऑक्टोंबर, २०२१

वाचा:-

१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. युएलपी-१०२०/२९०/५०९/प्र.क्र.२८/आस्था-३/ २८५२०, दि.१/९/२०२१.
२) मा. कामगार न्यायालय, बुलढाणा येथे दाखल तक्रार क्र. ४२/२०१२ बाबत दिलेला दि.२/१२/२०१३ चा न्यायनिर्णय.
३) मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथे दाखल रिव्हीजन युएलपी क्र. १००/२०१३ बाबत दिलेला दि.४/१२/२०१९ चा न्यायनिर्णय.

प्रस्तावना:-

जिल्हा फळरोपवाटिका, बुलढाणा यांचे प्रक्षेत्रावर सौ.लता अनिल डुकरे यांना कामाच्या उपलब्धतेनुसार मजूर म्हणून हंगामी स्वरूपात रोजंदारी तत्वावर काम देण्यात आले होते. सदर कालावधीत काम करताना सौ.लता अनिल डुकरे (पाटील) यांनी कधीही कोणत्याही आर्थिक वर्षात २४० दिवसांपेक्षा जास्त काम केलेले नाही. त्यामुळे दि.१६/७/२०१२ रोजी त्यांना कामाची उपलब्धता पाहता मजूरांची आवश्यकता नसल्याने मौखिक आदेशाव्दारे कामावरून कमी करण्यात आले होते. कामावरून कमी केल्याने मौखीक सेवा बेकायदेशीर ठरवून पुर्ववत कामावर घेऊन मागील सर्व मजूरीची रक्कम मिळणेसाठी त्यांनी मा.कामगार न्यायालय, बुलढाणा येथे युएलपी क्र. ४२/२०१२ दाखल केला. त्यामध्ये दि.०२/१२/२०१३ रोजी निकाल होवून, मा. कामगार न्यायालयाने सौ. डुकरे यांचे दि.१६/७/२०१२ पासूनचे निलंबन बेकायदेशीर ठरवत रद्य केले. तसेच सौ.डुकरे यांना पुर्ववत सलगतेसह व मागील पूर्ण मजूरीसह कामावर पुर्नस्थापित करण्याचे आदेश देवून न्यायालयीन प्रकरणाच्या खर्चाची रु.२०००/- रक्कम अर्जदार यांना देण्याचे निदेश दिले आहेत. त्यानुषंगाने कृषि आयुक्तालयाने सादर केलेल्या प्रस्तावातील सौ.लता अनिल डुकरे (पाटील), रोजंदारी मजूर यांना

कामावर घेवून त्यांना निलंबन कालावधीचे वेतन रु.३,११,८१०/- (रुपये तीन लाख अकरा हजार आठशे दहा मात्र) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

सौ.लता अनिल डुकरे (पाटील), शासकीय मजुर जिल्हा फळरोपवाटिका, बुलढाणा यांच्या प्रकरणी मा.औद्योगिक न्यायालय, अकोला येथे दाखल रिव्हीजन युएलपी क्र. १००/२०१३ मध्ये दिलेल्या दि.४/१२/२०१९ च्या न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने कामावर घेवून त्यांना निलंबन कालावधीचे वेतन देण्यासाठी तसेच अर्जाचा खर्च म्हणून रु.२०००/- अशी एकूण रु.३,११,८१०/- (रुपये तीन लाख अकरा हजार आठशे दहा मात्र) इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. न्यायालयीन प्रकरणात वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ दि.१७/४/२०१५ भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-२, नियम क्रमांक-७ नुसार प्रशासनिक विभाग प्रमुख यांना पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत. या अधिकारानुसार सौ.लता अनिल डुकरे (पाटील) यांना कामावर घेवून त्यांना निलंबन कालावधीचे वेतनाची रक्कम वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. आयुक्त (कृषि) कार्यालयाने मा.न्यायालयाने दिलेल्या न्यायनिर्णयानुसार देय ठरणारी रक्कम शासनाचे प्रचलित नियम, अटी व शर्ती व आदेशांचे अनुपालन करुन वितरीत करण्यात यावी. तसेच या प्रकरणी कोणतीही प्रशासकीय वा वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

४. यावरील येणारा खर्च मागणी क्र.डी-३, २४०१-पिकसंवर्धन, ११९ बागायती व भाजीपाला, ११९(०३) रोपमळे, (०३)(०२) भाजीपाला रोपमळे, फळरोपमळे व स्थानिक उद्याने (२४०१ १७२२) (०२-मजूरी) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ करिता उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा. सदर रक्कम कोषागारातून आहरीत व वितरीत करण्यासाठी उप विभागीय कृषि अधिकारी, बुलढाणा यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय विधी व न्याय विभाग, नागपूर यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.६९६/II W.P./१२२०/२०, दि.०३/०९/२०२० रोजीचे अभिप्राय व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२८९/२०२१/व्यय-१, दि.२०/०९/२०२१ रोजीच्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२०१६३९४७०६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्रांचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Hemant Gorakhnath Mhapankar
Date: 2021.10.20 16:42:29 +05'30'

**( हे. गो. म्हापणकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत अग्रेषित:-**

१) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य पुणे.
२) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई/ नागपूर.
४) सह संचालक (आस्थापना),कृषि आयुक्तालय,पुणे.
५) सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष नवीन प्रशासकीय भवन, ५ वा माळा मुंबई-३२.
६) विभागीय कृषि सह संचालक, अमरावती.
७) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,बुलडाणा,
८) जिल्हा कोषगार अधिकारी, बुलडाणा.
९) निवड नस्ती/कार्या.१३-अे.